**श्रीम. हिरा काशिनाथ शेळके, धर्मादाय सह आयुक्त, यांच्या सेवा सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- सीएचए २०१७/प्र.क्र.११/का.१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) गृह विभाग आदेश क्र.डीपीपी-२०११/२९१/प्र.क्र.६०/पोल-१० दि.२८.०६.२०११
२) अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयीन आदेश क्र.सअआस्था/८९/१५४३/२०११ दि.३०.०६.२०११
३) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.सीएचए-२०१४/प्र.क्र.४२/का-१ दि.०७.११.२०१४
४) सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता औरंगाबाद आदेश क्र. ससंवसअ/औबाद/अस्था/७०३/२०१४ दि.०७.११.२०१४
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.रानिप्र-२०२४/प्र.क्र.३५/सेवा-४, दि.३०.०५.२०२४

**प्रस्तावना :**

श्रीम. हिरा काशिनाथ शेळके या गृह विभागाच्या अधिनस्त अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवर सहायक सरकारी अभियोक्ता, गट-अ पदावर रुजू झाल्या. श्रीम. शेळके यांची धर्मादाय संघटनेतील "धर्मादाय उप आयुक्त" या पदी निवड झाल्याने, त्यांना संदर्भ क्र. ४ येथील आदेशान्वये दिनांक ०७.११.२०१४ (म.पू.) पासून कार्यमुक्त करण्यात आले. श्रीम. शेळके या संदर्भ क्र. ३ येथील आदेशानुसार धर्मादाय संघटनेत "धर्मादाय उप आयुक्त" पदावर रुजू झाल्या असून, त्या आजतागायत धर्मादाय संघटनेत कार्यरत आहेत.

२. श्रीम. शेळके यांनी वित्त विभागाच्या दिनांक ३०.०५.२०२४ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद २ मधील सर्व अटींची खालीलप्रमाणे पूर्तता केली आहे:

१) श्रीम. शेळके यांची सहायक सरकारी अभियोक्ता, गट-अ पदावरील नियुक्ती नियमित स्वरुपाने व वैध मार्गाने झालेली आहे.
२) श्रीम. शेळके यांनी पहिल्या पदाचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केलेला आहे.
३) श्रीम. शेळके यानी धर्मादाय उप आयुक्त या पदाच्या परिक्षेसाठी प्र. सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता, औरंगाबाद यांचेकडून पूर्वपरवानगी घेतली आहे.
४) श्रीम. शेळके यांच्या उक्त दोन्ही पदांच्या सेवेदरम्यान कोणताही खंड नाही.

३. उपरोक्त बाबी लक्षात घेता, वित्त विभागाच्या दिनांक ३१.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच संदर्भाधीन दिनांक ३०.०५.२०२४ च्या शासन परिपत्रकातील अटींची पूर्तता होत असल्यामुळे, श्रीम. हिरा शेळके यांची दिनांक ०७.०७.२०११ ते दि.०७.११.२०१४ (म.पू.) या कालावधीतील सहायक

सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावरील सेवा, दि.०७.११.२०२४ (म.नं.) पासूनच्या धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील "धर्मादाय उप आयुक्त" या पदावरील सेवेस जोडून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

श्रीम. हिरा काशिनाथ शेळके यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असून, वित्त विभागाच्या दिनांक ३१.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच संदर्भाधीन दिनांक ३०.०५.२०२४ च्या शासन परिपत्रकातील अटींनुसार श्रीम. हिरा काशिनाथ शेळके यांची दि. ०७.०७.२०११ ते दि.०७.११.२०१४ (म.पू.) या कालावधीतील सहायक सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावरील सेवा, दि.०७.११.२०२४ (म.नं.) पासूनच्या धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील "धर्मादाय उप आयुक्त" या पदावरील सेवेस फक्त सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्यास या शासन आदेशाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६४/सेवा-७, दिनांक ०३.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक क्रमांक २०२५०३२८१३२१२२६३१२ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2025.03.28 13:22:08 +05'30'

**(मनिषा कदम)**
**सहायक सॉलिसिटर -नि- उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. श्रीम. हिरा काशिनाथ शेळके, धर्मादाय सह आयुक्त, नांदेड
३. सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, नांदेड विभाग, नांदेड.
४. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग (सेवा-७)
८. निवडनस्ती (कार्या-१)